**ज्योतीबा देवस्थान, मौजे वाडीरत्नागिरी, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर येथील कापुरबाव (कर्पूरेश्वर ) तलावाचे पर्यावरण संवर्धनासाठी जिल्हा परिषदेकडून राबविण्यात येणा-या प्रकल्पातील कामांच्या खर्चास निधी मुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१९/प्र.क्र. ८३/तां.क.२**
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ नोव्हेंबर २०१९

वाचा :-

१) पर्यावरण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय , दिनांक ७ जानेवारी २०१६
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचे पत्र जा.क्र. जिप/ग्रापापु/कावि/८-वशि/७८६/२०१६ दिनांक ६.५.२०१६
३) शासन पत्र क्रमांक रासयो २०१३/प्र.क्र.१५०/ता.क.३ दिनांक २.६.२०१६
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर याचे पत्र जा.क्र. जिप/ग्रापापु/कावि/८- वशि/४७८/२०१६ दिनांक २९.६.२०१६
५) पर्यावरण विभागाचा समक्रमाकांचा शासन निर्णय दिनांक १७ जानेवारी, २०१८.

प्रस्तावना -

राज्य सरोवर संवर्धन योनजेतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचेमार्फत प्राप्त मौजे वाडीरत्नागिरी, येथील कर्पुरेश्वर तलावाच्या संवर्धन प्रस्तावास संदर्भाधीन दिनांक ७ जानेवारी २०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त तलावाच्या संवर्धनाच्या अनुषंगाने मंजूर करण्यात आलेली कामे राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ७ जानेवारी, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये रुपये ५०,००,०००/- (रु.पन्नास लक्ष फक्त) व दिनांक १७ जानेवारी २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रुपये ६०,००,०००/- (रु. साठ लक्ष फक्त ) असे मिळून आतापर्यंत रुपये १,१०,००,०००/- (एक कोटी दहा लक्ष फक्त ) इतका निधी मुक्त करण्यात आला होता. सदर रकमेचा पुर्णपणे विनियोग झाल्याबाबत संबंधितांनी उपयोगिता प्रमाणपत्र, कामाचा भैातिक व वित्तीय प्रगती अहवाल, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी सादर केले आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने जिल्हा परिषद, कोल्हापूर यांच्या हद्दितील मौजे वाडीरत्नागिरी येथील कर्पूरेश्वर तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी उर्वरित निधी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्य योजनेखाली राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर, यांच्या हद्दीतील मौजे वाडीरत्नागिरी येथील कर्पूरेश्वर तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ७ जानेवारी २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण मंजूर रु. २,३८,९२,०१५/- (रु दोन कोटी अडतीस लक्ष ब्याण्णव हजार पंधरा फक्त) एवढया निधीमधील राज्य हिश्श्यापोटी एकूण रुपये २,१५,०२,८१४/- (रुपये दोन कोटी पंधरा लक्ष दोन हजार आठशे चैादा फक्त ) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. मंजूर रकमेपैकी आतापर्यत मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना रक्कम रुपये १,१०,००,०००/- (रु. एक कोटी दहा लक्ष फक्त ) इतका निधी वितरित करण्यात आला असून आत या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना मौजे वाडीरत्नागिरी येथील कर्पुरेश्वर तलावाच्या संवर्धनासाठी उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता एकूण ५०,००,०००/- (रु. पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेस मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत मौजे वाडीरत्नागिरी येथील कर्पुरेश्वर तलावाच्या पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी मंजूर एकूण एकूण रु. २,३८,९२,०१५/- (रु. दोन कोटी अडतीस लक्ष ब्याण्णव हजार पंधरा फक्त) पैकी मौजे वाडीरत्नागिरी येथील कर्पूरेश्वर तलावाच्या संवर्धनासठी राज्य हिश्श्ययापोटी एकूण रु. २,१५,०२,८१४/- (रु. दोन कोटी पंधरा लक्ष दोन हजार आठशे चैादा फक्त ) इतक्या मंजूर रकमेपैकी पुढील हप्ता म्हणून रुपये ५०,००,०००/- (रु. पन्नास लक्ष फक्त ) इतकी रक्कम खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर (Chief Executive officer, Zilla Parishad, Kolhapur) यांचे नांवे रुपये ५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त ) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना अदा करावयाची रुपये ५०,००,०००/- (रु. पन्नास लक्ष फक्त ) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीम. शिल्पा चं. शिर्के, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सु.की. निकम, उपसचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना रुपये ५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त ) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाव्दारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२),पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पित रु.१५,००,००,०००/- (रु. पंधरा कोटी) च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५०/१४६१, दिनांक १३.३.२०१३ अन्वये तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्रक्र. ७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ मधील परि. क्र.७ ते १८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक १८.४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्टातील अनु.क्र. ३ व ८ मधील अटींची पुर्तता होत आहे, तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थस २०१८/प्र.क्र.६९/अर्थ् -३ दिनांक २ एप्रिल २०१८ रोजीच्या अटी व शर्तीनुसार वितरित करण्यात येत आहे.

१. वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि. २ एप्रिल २०१८ अन्वये ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यात विभागाला अधिकारी प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

२. वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दि. ८.७.२०१९ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,२,३,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

३. वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दि. ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ३ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येत की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच सदर दिनांक २ एप्रिल २०१८

रोजीच्या परिपत्रकसोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील सूचीमधील अनुक्रमांक १,२,४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ३ व अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

७. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा ५ दिनांक १०.०५.२०१६ अन्वये परिच्छेद क्र.४ मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकाराबाबत वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र अर्थस २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक २.४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ) नुसार रु.५ कोटी पर्यंतच्या अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत.

२) मौजे वाडीरत्नागिरी जि. कोल्हापूर येथील कर्पुरेश्वर तलावाच्या प्रस्तावासाठी रु. २,३८,९२,०१५/- (रु दोन कोटी अडतीस लक्ष ब्याण्णव हजार पंधरा फक्त) एवढया मंजूर निधीमधील राज्य हिस्सा रु. २,१५,०२,८१४/- (रुपये दोन कोटी पंधरा लक्ष दोन हजार आठशे चौदा फक्त ) पैकी पुढील हप्ता रु. ५०,००,०००/- (रु. पन्नास लक्ष फक्त ) इतका निधी पुढील हप्त्यापोटी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात येत आहे.

३) सदर तलावास मागील तीन महिन्यात कोणताही निधी मंजूर करण्यात आलेला नाही. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा १०० टक्के विनियोग पूर्ण केला असल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

४) "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदुषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)"या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५. जिल्हा परिषद कोल्हापूर यांच्याकडून पर्यावरण विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

६. तसेच उपरोक्त शासना निर्णयाच्या "अ" मधील परिच्छेदातील ६,७,८,९ या बाबी लागू नाहीत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२९१२२६३९३९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Shuddhodhan D Aher

Digitally signed by Shuddhodhan D Aher
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19193e305825f30c0c7381430cc0f9fc9d9e4c47c2406ef9eca6ab6b77af1844, serialNumber=d9ed3af978d744c807b97e5551edcd2ab6f11c5495f5d6ef4863887d2775315c, cn=Shuddhodhan D Aher
Date: 2019.11.29 12:31:14 +05'30'

**( शु. द. आहेर )**

**उप सचिव ,पर्यावरण विभाग**

**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, कोल्हापूर.
५. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
११. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. प्रधानसचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१३. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१५. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.